राज्य रक्त संक्रमण परिषद, मुंबई यांना सन २०२३-२४ च्या अनुदानातून (२२१० ४४७३) रु.२.५२ कोटी इतक्या निधी वितरणाबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
**शासन निर्णय क्रमांक : राररसे-२०२१/प्र.क्र.२८३ /आ-५.**

जी.टी.रुग्णालय आवार, कॉम्प्लेक्स बिल्डींग,
१० मजला, नवीन मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: ३१ ऑगस्ट , २०२३

वाचा :

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थसंकल्प-३, दि. १२ एप्रिल, २०२३.
२) संचालक, राज्य रक्त संक्रमण परिषद मुंबई यांचे पत्र क्र. रा.र.सं.प/लेखा/डेस्क-३/फाईल क्र.२१/८२८/२०२३, दि. २६.०५.२०२३

प्रस्तावना :

राज्य रक्त संक्रमण परिषद ही शासकीय स्वायत्त संस्था असून या संस्थेचा मूळ उद्देश राज्यात सुरक्षित रक्ताचा मुबलक पुरवठा वाजवी किंमतीत करणे हा आहे. परिषदेसाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात रु. १८.०० कोटी इतकी तरतूद सहाय्यक अनुदान म्हणून अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. संचालक, राज्य रक्त संक्रमण परिषद, मुंबई यांचेकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार राज्य रक्त संक्रमण परिषदेसाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता माहे एप्रिल ते जून २०२३ या कालावधीसाठी लागणारा खर्च भागविण्यासाठी रु.२,५२,००,०००/-(रुपये दोन कोटी बाबन्न लक्ष फक्त) एवढा निधी वितरित करण्यास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

राज्य रक्त संक्रमण परिषदेमार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध लोकोपयोगी योजनांच्या अंमलबजावणीकरिता महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तकांमध्ये उल्लेख केलेल्या नियम व वित्त विभागाच्या संदर्भिय वाचा क्र.१ मधील मार्गदर्शक सुचनांचे पालन करण्याच्या अटींच्या पूर्ततेच्या अधीन राहून खर्च भागविण्यासाठी एकूण रु.२,५२,००,०००/-(रुपये दोन कोटी बाबन्न लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर मंजूर अनुदानातून राज्य रक्त संक्रमण परिषदेमार्फत राबविण्यात येणा-या रक्त संक्रमण या लोकोपयोगी योजनेचा खालील तक्त्यात दिल्याप्रमाणे तपशिलवार खर्च भागविण्यात यावा.

| अ.क्र. | खर्चाचा तपशील | माहे एप्रिल ते जून, २०२३ या कालावधीसाठी लागणारी अंदाजित रक्कम |
|---|---|---|
| १ | राज्य रक्त संक्रमण परिषद व सर जे.जे.महानगर रक्तकेंद्र, भायखळा येथील कंत्राटी कर्मचा-यांचे वेतन, भविष्य निर्वाह निधी, अतिकालीक भत्ता, दैनिक भत्ता व इतर भत्ते अदा करणे | रु.६०,००,०००/- |
| २ | सर जे.जे. महानगर रक्तपेढी, भायखळा येथील मनुष्यबळ सेवा, हाऊसकिपिंग, सुरक्षा रक्षक, बायोमेडिकल वेस्ट, इलेक्ट्रिकल देखभाल इत्यादी कामे पुरविण्यात येणा-या संस्था/कंत्राटदारांचे देयक अदा करणे | रु.२५,००,०००/- |
| ३ | सर जे.जे. महानगर रक्तकेंद्रासाठी कन्झुमेबल्स/रिएजंट खरेदी करणे | रु.६०,००,०००/- |
| ४ | राज्य रक्त संक्रमण परिषद व सर जे.जे. महानगर रक्तकेंद्र, भायखळासाठी कार्यालयीन कामकाजाकरीता स्टेशनरी/छपाई साहित्य खरेदी करणे | रु.२,६०,०००/- |
| ५ | राज्य रक्त संक्रमण परिषद कार्यालय, सर जे.जे. महानगर रक्तकेंद्र येथील विद्युत देयके, दूरध्वनी देयके, मालमत्ता कर इतर कार्यालयीन किरकोळ खर्च | रु.२,८०,०००/- |
| ६ | कुरीअर चार्जेस व पोस्टेज चार्जेस इतर कार्यालयीन किरकोळ खर्च | रु.१,००,०००/- |
| ७ | वृत्तपत्रात पदभरती, दरपत्रकेबाबत वर्गीकृत जाहिरात प्रसिध्द करणे व जाहिरात प्रसिध्द करणाऱ्या संस्थेची देयके अदा करणे | रु.२,००,०००/- |
| ८ | संगणक, लॅपटॉप, प्रिंटर, सर्वर, वेबसर्वर व संकेतस्थळ, वातानुकुलित यंत्रे व इतर कार्यालयीन यंत्राची वार्षिक देखभाल | रु.१,२०,०००/- |
| ९ | राज्य रक्त संक्रमण परिषद व सर जे. जे. महानगर रक्तकेंद्र येथील वाहनांची दुरुस्ती, डिझेल, पेट्रोल, इंधनाची देयके अदा करणे | रु.४,४०,०००/- |
| १० | बैठकांसाठी येणारा खर्च | रु.८०,०००/- |
| ११ | जागतिक रक्तदाता दिन १४ जून, २०२३ निमित्त स्वैच्छिक रक्तदात्यांचे आभार मानण्यासाठी वृत्तपत्रात दर्शनी जाहिरात प्रसिध्द करणे व स्वैच्छिक रक्तदानाचा प्रचार व प्रसार करण्यासाठी जिल्हा स्तरावरील शासकीय रक्तकेंद्रांना निधी वितरीत करणे | रु.३४,००,०००/- |

| अ.क्र. | खर्चाचा तपशील | माहे एप्रिल ते जून, २०२३ या कालावधीसाठी लागणारी अंदाजित रक्कम |
|---|---|---|
| १२ | थॅलेसिमिया व सिकलसेल आजारग्रस्त रुग्णांना मोफत रक्त पुरवठा करणाऱ्या परवानाधारक रक्तपेढ्यांना आर्थिक सहाय्य (रु.१००/-प्रति रक्तपिशवी) | रु.३०,००,०००/- |
| १३ | राज्य रक्त संक्रमण परिषद व सर जे.जे. महानगर रक्तकेंद्रासाठी येणारा कार्यालयीन किरकोळ खर्च | रु.१,००,०००/- |
| १४ | शासकीय रक्तपेढीतील रक्तघटक विलगीकरणासाठी जिल्हा स्तरावर कंत्राटी स्वरुपाने नियुक्त करण्यात आलेल्या टेक्निकल सुपरवायझर यांच्या वेतनाचा निधी पाठविण्याबाबत | रु.१९,२०,०००/- |
| १५ | खारघर प्रशिक्षण केंद्र येथील समन्वयक यांचे वेतन | रु.२,००,०००/- |
| १६ | खारघर प्रशिक्षण केंद्र येथील हाऊसकिपिंग, सुरक्षा रक्षक, इलेक्ट्रिकल देखभाल, लिफ्ट देखभाल इत्यादी कामे पुरविण्यात येणा-या संस्था /कंत्राटदारांचे देयक अदा करणे | रु.३,००,०००/- |
| १७ | खारघर प्रशिक्षण केंद्र येथील कर, सर्विस चार्जेस, विद्युत देयके, पाणी देयक इत्यादी | रु.२,००,०००/- |
| १८ | खारघर प्रशिक्षण केंद्र येथील किरकोळ खर्च | रु.१,००,०००/- |
| | एकूण | **रु.२,५२,००,०००/-** |

३. सदर बाबी वरील खर्च मागणी क्र. आर-१, २२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१- नागरी आरोग्य सेवा विषम चिकित्सा, ११०- रुग्णालये व दवाखाने, राज्य योजनांतर्गत योजना, (०६) (२५) रक्त संक्रमण सेवा, ३१- सहाय्यक अनुदाने (२२१० ४४७३) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरिता सहाय्यक अनुदान वितरणाचा प्रस्ताव, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२३ निधी वितरणाबाबत वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३ दि.१२ एप्रिल,२०२३ मधील अटींची पूर्तता होत आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे. तसेच सदर प्रस्तावाशी संबधित लेखाशिर्षाखाली ३ महिन्यांपूर्वी वितरित केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरिक्षण/ महालेखापाल यांचे गंभीर आक्षेप नाहीत. या योजनेतंर्गतचा निधी लाभार्थ्यांच्या थेट खात्यात जमा होत नाही. सदर योजनेतंर्गत वस्तू खरेदी प्रस्तावात खरेदी नियोजन करण्यात येते व आवश्यकतेनुसार दरकरारावर खरेदी करण्यात येते. तसेच भांडवली वस्तूंच्या खरेदीनंतर डेड स्टॉक रजिस्टरमध्ये नोंद घेण्यात येते. सदर योजनेच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जुने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. सदरचे देय सशर्त असून वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. २०१३/प्र.क्र.८५/२०१३-अर्थसंकल्प-३ दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

५. राज्य रक्त संक्रमण परिषदेस वितरीत अनुदानाशी संबंधीत खर्चाचे देयक अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे सादर करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना व सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदरचा शासन निर्णय नियोजन विभाग अ.नौ.सं.क्र.१९८/१४७२ , दि.०२.०८.२०२३ व वित्त विभाग अनौसं ३३७/व्यय-१३ दि.२५.०८.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७२५१४०६२३७०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2023.08.31 15:20:20 +05'30'

**(अशोक आत्राम)**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) आणि (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
२. अधिदान व लेखा अधिकारी, लेखा व कोषागारे, मुंबई.
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई / पुणे.
५. सहाय्यक संचालक, राज्य रक्त संक्रमण परिषद, मुंबई.
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
७. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
८. सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा), (लेखा शाखा), मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी (व्यय-१३ / अर्थसंकल्प-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी / का. १४७२, नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती (आरोग्य-५)